प्रादेशिक पातळीवर विधी सल्लागार
केंद्र स्थापन करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्र.संकीर्ण २००३/ प्र.क्र. ७३/ का.९
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक २५ फेब्रुवारी, २००४

वाचा : १) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र. विकास २००३/प्र.क्र. १७ (०३)/ का.३ (११), दिनांक २९.४.२००३.

२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. संकीर्ण २००३/ प्र.क्र. ५२/ का.७, दिनांक ५ जानेवारी, २००४.

३) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२००३/प्र.क्र.७३/का.९, दि.५.१२.२००३ व दिनांक १२.१२.२००३.

प्रस्तावना : आदिवासींच्या जमिनीच्या पुर्न स्थापनेबाबतच्या अधिनियमांची प्रभावी अंमलबजावणी, संनियंत्रण व मार्गदर्शनाकरिता त्याचप्रमाणे आदिवासींना विधी विषयक सहाय्य देण्यासाठी प्रादेशिक पातळीवर विधी सल्लागार केंद्र स्थापन करण्याचे प्रस्तावित होते. आदिवासींना जमीन प्रत्यार्पित करण्याबाबतच्या अधिनियम सन १९७४ मधील तरतूदीनुसार दिनांक १ एप्रिल, १९५७ ते दिनांक ६ जुलै,१९७४ या कालावधीतील बिगर आदिवासींकडे हस्तांतरीत झालेल्या परंतु दि. ६ जुलै, १९९४ पूर्वी बिनशेती वापराकडे वर्ग न झालेल्या आदिवासींच्या जमिनी त्यांना परत देण्याबाबतचा अधिनियम करण्यात आलेला आहे. अशाप्रकारचे आदिवासींच्या जमिनीचे दावे जिल्हाधिकारी व विभागीय आयुक्तांकडे हाताळले जातात. ते जमीनीचे दावे हाताळण्याकरिता अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, अमरावती, नागपूर, नाशिक या कार्यालयात विधी व्यावसायीकांचे पॅनल स्थापन करावयाचा प्रस्ताव विचाराधिन होता.

शासन निर्णय : उपरोक्त पार्श्वभूमीवर शासन सदरहू योजनेस सन २००३-०४ या वर्षाकरिता आदिवासींना जमिनी प्रत्यार्पित करण्याबाबत अधिनियम १९७४ मधील तरतूदींचा बिगर आदिवासींकडे हस्तांतरीत झालेल्या परंतु बिनशेती वापराकडे वर्ग न झालेल्या आदिवासींच्या जमिनी त्यांना परत देण्याबाबत कायद्याची अंमलबजावणी जिल्हाधिकारी कार्यालयात व विभागीय आयुक्त कार्यालयात हाताळली जाते. तेथे सदर दावे हाताळण्याकरिता अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, अमरावती, नागपूर, नाशिक या कार्यालयात विधी व्यावसायीकांचे पॅनल स्थापन करण्यास शासन या निर्णयांन्वये मान्यता देत आहे.

२. याबाबतच्या अटी व शर्थी पुढील प्रमाणे :-

१) ज्या विधी व्यावसायिकांनी आदिवासींच्या बाजूने निर्णय लावून घेतले आहेत,

२) जे विधी व्यवसायी स्वत: आदिवासी समाजाचे आहेत,

३) विधी व्यवसायिकाने जर आदिवासींच्या जमिनीच्या दाव्यात त्यांच्या बाजूने निकाला लावला तर त्यांना देय असलेली फी दिली जाईल व या फि च्या ५०% रक्कम प्रोत्साहन म्हणून अदा केली जाईल. परंतु जर निकाल विरुध्द लागला तर नियमानुसार देय असलेल्या फिच्या ५०% रक्कम देय राहील.नाममात्र उपस्थिती फी देण्यात यावी.

४) विधी व्यावसायिकांचे जे पॅनल असेल त्या पॅनलला प्रलंबित असलेल्या जमिनीच्या दाव्याची समप्रमाणात वाटणी करावी.

५) प्रत्येक महिन्यात विधी व्यावसायिकांनी किती दावे निकाली काढावे याचे प्रमाण अपर आयुक्तांनी ठरवून द्यावे.

६) प्रत्येक महिन्यात निकाली काढलेल्या दाव्याचा आढावा अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी घ्यावा.

७) नियुक्त केलेले विधी व्यावसायिक हे आदिवासींच्या जमिनीच्या दाव्याबाबत अर्जाचा मसूदा तयार करणे व दाखल करणे, प्रत्यक्ष दाव्याच्या दिवशी हजर राहणे, याबाबतची इतर व अनुषंगिक सर्व कामे करतील. त्याकरिता जिल्हा न्यायालयातील सरकारी वकिलांनी जी फी देय आहे ती फी पॅनलवरील वकिलांना देय राहिल.

३. विधी व्यावसायिकांचे पॅनल तयार करण्यासाठी अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी जाहिरात देवून अर्ज मागवून घ्यावे व ते अर्ज आयुक्त, आदिवासी विकास यांचेकडे पाठवावे, आयुक्तांनी दि.२०.३.२००४ पर्यंत सर्व प्रक्रिया करुन विधी व्यवसायीकाची यादी तयार करावी.

४. महाराष्ट्र शासन (तृतीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २००३ महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-३३ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दि. २६ डिसेंबर, २००३ अन्वये पारित झाला आहे. त्यामुळे सदरहू योजना सन २००३-०४ वर्षापासून राबविण्याकरिता रु. ४.०० लक्ष (रुपये चार लक्ष फक्त) इतका निधी शासनाकडून उपलब्ध करुन देणा आहे. सदरहू योजना तातडीने हाती घेणे व अंमलबजावणी करणे आवश्यक आहे. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, अमरावती व नागपूर या कार्यालयांना प्रत्येकी रु. १.०० लाख प्रमाणे एकूण रु. ४.०० लाख खर्च करण्यास शासन या निर्णयान्वे मंजूरी देत आहे. सदरहू खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

"मागणी क्र. टि-४, लेखाशिर्ष :२२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-जनजाती क्षेत्र उपयोजना- ०२-अनुसूचित जमातीचे कल्याण-००१-संचालन व प्रशासन-(१३) विधी सल्लागार केंद्र- (०३) (०१) राज्य योजनातर्गत योजना (२२२५-३४१४)"

५. वरील रक्कम आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्याअधिनस्त ठेवण्यात येत आहे व ते सदरहू निधी संबंधित अपर आयुक्त यांना विधी व्यावसायिकांचे पॅनल स्थापन करण्याची प्रक्रिया पूर्ण झाल्यावर वितरित करतील. याबाबतची सर्व जबाबदारी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांची राहील.

६. प्रस्तुत आदेश हे वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १०२५/०३/व्यय-१४, दिनांक ४.११.२००३ अन्वये व अनौ. संदर्भ क्र. ५१९/ अर्थोपाय, दि. २३.२.२००४ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( स. नु. गावीत )
उप सचिव

प्रति,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास.
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपुर.
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपुर.
व्यवस्थापकीय संचालक, आदिवासी विकास महामंडळ, मर्या. नाशिक.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नविन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई-३२.
कक्ष अधिकारी (अर्थ-१७/व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
कक्ष अधिकारी (का.६,७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.९), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

प्रादेशिक पातळीवर विधी सल्लागार
केंद्र स्थापन करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग,**

**शासन शुध्दीपत्र क्र.संकीर्ण २००३/ प्र.क्र. ७३/ का.९**

**मंत्रालय विस्तार, मुंबई-३२**

**दिनांक ४ ऑगस्ट, २००४**

<u>वाचा</u> : १) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र. विकास २००३/प्र.क्र. १७ (०३)/ का.३ (११), दिनांक २९.४.२००३.

२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. बीयुडी २००३/पुरक मागण्या/ प्र.क्र. ५२/का.७, दिनांक ५ जानेवारी, २००४.

३) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग, क्रमांकसंकिर्ण-२००३/ प्र.क्र.७३/ का.९, दि.५.१२.२००३ व दिनांक १२.१२.२००३.

४) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग, क्रमांकसंकिर्ण-२००३/प्र.क्र.७३/ का.९, दि.२५.२.२००४

**<u>शासन शुध्दीपत्र</u> :-** शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. संकीर्ण २००३/प्र.क्र ७३/का.९ दिनांक २५ फेब्रुवारी, २००४ मधील परिच्छेद २(२) मध्ये जे "विधी व्यवसायी स्वत: आदिवासी समाजाचे आहेत" अशी अट घातली आहे, त्याऐवजी "आदिवासी समाजाच्या विधी व्यावसायिकांना प्राधान्य देण्यात येईल" .अशी अट समविष्ट करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( अ. मा. आत्राम )
कार्यासन अधिकारी

प्रति,
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
आयुक्त, आदिवासी विकास नाशिक.
प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग,(महसूल), मंत्रालय, मुंबई.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/ नाशिक/अमरावती/नागपुर

सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.

महालेखापाल (लेखा परिक्षा)(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपुर.

महालेखापाल (लेखा परिक्षा)(लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपुर.

वित्त विभाग (व्यय-१४/अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई.

मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई-४०० ६१४.

सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

लेखा व कोषागारे संचालनालय, संगणक शाखा, नवित प्रशासकीय भवन, मुंबई-३२.

कार्यासन क्रमांक (६/७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

निवड नस्ती (का.९), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.